**राज्य प्रशासकीय व्यवसाय शिक्षण संस्था,मुंबई व भारतीय प्रशासकीय सेवा पुर्व प्रशिक्षण केंद्र, कोल्हापूर, नागपूर, औरंगाबाद :-**
पाहुणे प्राध्यापकांचे मानधन वाढविण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्रशिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : राप्रव्यशि २००९ / प्र. क्र. ७३ (१) / मशि - २,**
**मंत्रालय ( विस्तार ), मुंबई - ४०० ०३२.**
दिनांक : ३१ मे, २०११

संदर्भ : शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, क्रमांक : आयएएस १०९८ / (११३/९८) / मशि - १, दिनांक २१ ऑगस्ट, १९९८.

**प्रस्तावना:-** महाराष्ट्रातील होतकरू बुध्दीवान उमेदवारांना आय.ए.एस., आय.पी.एस., इत्यादी सारख्या केंद्रीय लोकसेवा आयोगातर्फे आयोजीत केल्या जाणाऱ्या स्पर्धात्मक परीक्षांसाठी प्रशिक्षण देऊन त्यायोगे त्यांच्या यशाच्या संधी वाढवाव्यात व पर्यायाने सदरहू सेवांमध्ये महाराष्ट्रीय विद्यार्थ्यांना पुरेशा प्रमाणात वाव मिळावा या हेतूने शासनाने मुंबई येथे राज्य प्रशासकीय व्यवसाय शिक्षण संस्था या नावाने व कोल्हापूर, नागपूर, व औरंगाबाद येथे भारतीय प्रशासकीय सेवा पूर्व प्रशिक्षण केंद्र या नावाने प्रशिक्षण संस्था स्थापन केल्या आहेत. या संस्थेतील विद्यार्थ्यांनी निवड केलेल्या विविध विषयांवर प्रशिक्षण व मार्गदर्शन हे तज्ञ प्राध्यापकामार्फत देण्यात येत असते. या पाहुण्या प्राध्यापकांना संदर्भांकित शासन निर्णयानुसार सध्या खालीलप्रमाणे मानधन देण्यात येते.

१) सर्वसाधारण प्रशिक्षण कार्यक्रम - रुपये १५०/- प्रति तास,
२) विशेष प्रशिक्षण कार्यक्रम - रुपये १५० ते २२५/- प्रति तास

सदर मानधनाचे दर वाढविण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता,

**शासन निर्णय :-** उक्त प्रशिक्षण कार्यक्रम हा विशेष प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गतच येत असल्याने सर्वसाधारण किंवा विशेष प्रशिक्षण कार्यक्रम असा फरक न करता, शासन आता या निर्णयाद्वारे राज्य प्रशासकीय व्यवसाय शिक्षण संस्था, मुंबई, व भारतीय प्रशासकीय सेवा पूर्व प्रशिक्षण केंद्रांमध्ये व्याख्याने देण्यासाठी निमंत्रित करण्यात येणाऱ्या व्याख्यात्यांच्या मानधनात वाढ करुन त्यांना **रुपये ६००/- (रुपये सहाशे फक्त ) प्रति तास** इतके मानधन देण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

वर मंजूर करण्यात आलेले सुधारित दर या शासन निर्णयाच्या दिनांकापासून खालील अटीच्या अधिन राहून लागू असतील:-

१) व्याख्याता म्हणजे राज्य प्रशासकीय व्यवसाय शिक्षण संस्था, मुंबई व भारतीय प्रशासकीय सेवा पुर्व प्रशिक्षण केंद्रांनी आयोजीत केलेल्या प्रशिक्षण कार्यक्रमात व्याख्यान देण्यासाठी आली असेल अशी व्यक्ती आणि प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत आयोजीत केलेल्या संम्मेलन, चर्चासत्र वा परिसंवादासाठी अध्यक्ष म्हणून आली असेल अशी व्यक्ती

२) तास म्हणजे एक तासाहून जास्त परंतु दीड तासाहून कमी असा वेळ.

३) स्थानिक व्याख्यात्यांसाठी मानधनाचा दर वाहन खर्चासहित असेल म्हणजेच त्यांना मानधनाखेरीज वेगळा वाहन खर्च (प्रवास भत्ता) मिळणार नाही, परंतु बाहेरील व्याख्याते व्याख्यानासाठी आले तर त्यांना विहित शासकीय नियमानुसार दैनिक भत्ता व वाहन खर्च (प्रवास भत्ता) देय असेल.

उपरोक्त खर्च," मागणी क्र.W-२, २२०२ - सर्वसाधारण शिक्षण, ८० सर्वसाधारण ००३, प्रशिक्षण (०२) (०१), राज्य प्रशासनीक सेवा संस्था, (२२०२११३३)," या लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २१६/व्यय-५, दिनांक २७.४.२०११ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

उपरोक्त शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक क्रमांक २०११०५३११२१२५५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

( सदाशिव शिवदास )
सहसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति

शिक्षण संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक, राज्य प्रशासकीय व्यवसाय शिक्षण संस्था, मुंबई,
संचालक, भारतीय प्रशासकीय सेवा पूर्व प्रशिक्षण केंद्र, नागपूर/कोल्हापूर/ औरंगाबाद,
सर्व सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य,
प्रधान महालेखापाल ( लेखापरीक्षा ) - १, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल ( लेखापरीक्षा ) - २, महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल ( लेखा व अनुज्ञयेता ), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर / कोल्हापूर / औरंगाबाद,/
कक्ष अधिकारी, वित्त विभाग, व्यय - ५ / सेवा - ६,
उच्च व तंत्र शिक्षण विभागातील सर्व कार्यासने,/निवड नस्ती.